**अनुसूचित जातीच्या मुलामुलींना परदेशात शिक्षणासाठी शिष्यवृत्ती देण्याबाबत.**
**विद्यार्थ्यांची निवड करणे सन २०१०-११.**

**महाराष्ट्र शासन**
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
शासन निर्णय क्रमांक : इबीसी २०१०/प्र.क्र.१९४/मावक-२
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २७ ऑक्टोबर,२०१०

**वाचा :-** १) शासन निर्णय सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग क्रमांक : इबीसी २००३/प्र.क्र.११५/मावक - २, दिनांक ११.६.२००३
२) शासन निर्णय सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग क्रमांक : इबीसी २००४/प्र.क्र.१०२/मावक - २, दिनांक ५.८.२००४
३) शासन निर्णय सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग क्रमांक : इबीसी २००६/प्र.क्र.३२९/मावक - २, दिनांक १७.६.२००६
४) शासन शुध्दीपत्र सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग क्रमांक : इबीसी २००६/प्र.क्र.३२९/मावक - २, दिनांक २०.६.२००६
५) शासन निर्णय सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग क्रमांक : इबीसी २०१०/प्र.क्र.१९४/मावक-२ दिनांक १५.७.२०१०
६) शासन शुध्दीपत्र सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग क्रमांक : इबीसी २०१०/प्र.क्र.१९४/मावक - २, दिनांक ११.७.२०१०

<u>प्रस्तावना</u> :- शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग क्रमांक इबीसी-२००३/प्र.क्र.११५/मावक-२, दिनांक ११.६.२००३ व शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग क्रमांक : इबीसी २००४/प्र.क्र.१०२/मावक - २, दिनांक ५.८.२००४ नुसार अनुसूचित जातीच्या विद्यार्थ्यांना परदेशात शिक्षणाची संधी मिळावी व त्यांच्या गुणवत्तेला वाव मिळावा म्हणून विविध विषयांमध्ये परदेशातील नामांकित विद्यापीठातील विविध विद्याशाखेत ज्या विद्यार्थ्यांना प्रवेश मिळेल अशा १० विद्यार्थ्यांना परदेश शिष्यवृत्ती मंजूर करण्याबाबतचे आदेश निर्गमित करण्यात आलेले आहेत. अनुसूचित जातीमधील जास्तीत जास्त विद्यार्थ्यांना परदेशात उच्च घेण्याची संधी उपलब्ध व्हावी यासाठी उपरोक्त दि.१७.६.२००६ च्या शासन निर्णयानुसार सन २००६-०७ या वर्षापासून १० विद्यार्थ्यांवरुन २५ विद्यार्थी संख्या वाढ करण्यात आलेली आहे. २५ विद्यार्थी संख्या करताना कला, विज्ञान व वाणिज्य शाखेतील पदवी व पदव्युत्तर अभ्यासक्रमासाठी जागा राखीव ठेवण्यात आल्या होत्या दर्जेदार पदवी व पदव्युत्तर अभ्यासक्रम भारतातील नामांकित विद्यापीठ/संस्थेमध्ये शिकविले जातात त्यामुळे पदव्युत्तर अभ्यासक्रमासाठी विशेष प्राविण्य मिळविण्याच्या दृष्टीने तसेच इतर देशातील नविन क्षेत्रामध्ये सुरु असलेल्या संशोधनाचा उपयोग करुन घेण्याच्या दृष्टीने पदव्युत्तर अभ्यासक्रमासाठी देण्यात येणा-या शिष्यवृत्तीमध्ये सुधारणा करुन सुधारित नियमावली शासन निर्णय दिनांक १५.७.२०१० व शासन शुध्दीपत्रक दिनांक १०.८.२०१० अन्वये लागू करण्यात आलेली आहे त्यानुसार पदव्युत्तर

अभ्यासक्रमासाठी १३ व संशोधनात्मक अभ्यासक्रमासाठी १२ अशा एकूण २५ विद्यार्थ्यांना खालीलप्रमाणे विद्या शाखानिहाय शिष्यवृत्ती मंजूर करण्याचे निश्चित करण्यात आलेले आहे :-

| अ क्र | शाखा | पदव्युत्तर पदवी | डॉक्टरेट |
|---|---|---|---|
| १ | कला | - | ५ |
| २ | वाणिज्य | - | २ |
| ३ | विज्ञान | - | ३ |
| ४ | व्यवस्थापन (Management) | ४ | - |
| ५ | अभियांत्रिकी | ५ | २ |
| ६ | वैद्यकीय | ४ | - |
| | **एकूण** | १३ | १२ |

वरीलप्रमाणे परदेशातील नामांकित विद्यापीठातील विविध शाखांमध्ये सन २०१०-११ मध्ये प्रवेश मिळालेल्या २५ विद्यार्थ्यांना परदेशात उच्च शिक्षणासाठी शिष्यवृत्ती मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-** शासन निर्णय सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग क्रमांक : इबीसी २०१०/प्र.क्र.१९४/मावक-२ दिनांक १५.७.२०१० मध्ये नमूद करण्यात आलेल्या निवड समितीची दिनांक १८.१०.२०१० रोजी बैठक झाली. सदर समितीने शिफारस केल्यानुसार निवड केलेल्या विद्यार्थ्यांची यादी सोबत जोडलेल्या **परिशिष्ट "अ"** मध्ये जोडलेली आहे. श्री. शरद शंकर पवार या विद्यार्थ्याची निवड सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग शासन निर्णय क्रमांक इबीसी २००९/प्र.क्र.२०६/मावक-२, दिनांक ०४.११.२००९ अन्वये एमबीए, ॲशलँड युनिव्हर्सिटी, यु.के. येथे करण्यात आली होती. सदर विद्यार्थ्याने सन २०१०-११ या वर्षात परदेशात उच्च शिक्षणासाठी जाण्याची अनुमती मागितलेली होती. सदर विद्यार्थ्यास मागील वर्षी निश्चित केलेले विद्यापीठ व अभ्यासक्रम तोच राहील या अटीवर निवड समितीने सन २०१०-११ साठी मान्यता दिलेली आहे.

२. सदरहू विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती प्रदान करण्यासाठी संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. विद्यार्थ्यांची यापुढील वर्षाची शिष्यवृत्ती मंजूर करण्याचे तसेच एखाद्या विद्यापीठाच्या शिक्षण शुल्कामध्ये वाढ किंवा घट होत असल्यास त्याबाबत मंजूरी करण्याचे अधिकार संचालक, समाजकल्याण, पुणे यांना देण्यात येत आहेत.

३. ज्या विद्यार्थ्यांना शासनामार्फत शिष्यवृत्ती मंजूर केली आहे, त्या विद्यार्थ्यांनी त्यांचे शिक्षण संपल्यानंतर देशाची सेवा करणे, त्यांच्या ज्ञानाचा फायदा देशाला करुन देणे आवश्यक आहे. या अनुषंगाने संबंधित विद्यार्थ्यांकडून शिष्यवृत्ती मंजूर करण्यापूर्वी **हमीपत्र (BOND)** लिहून घेण्यात यावे.

४. परदेशात वैद्यकीय अभ्यासक्रमासाठी प्रवेश घेतलेली संस्था भारतीय आयुर्विज्ञान परिषद (Indian Medical Council) यांनी मान्यता दिलेली असणे आवश्यक आहे. किंवा वैद्यकीय अभ्यासक्रमासाठी परदेशात प्रवेश घेतलेल्या विद्यार्थ्यांनी भारतात पदवी / पद्व्युत्तर पदवी घेऊन परत आल्यानंतर भारतीय आयुर्विज्ञान परिषद (Indian Medical Council) यांनी अनिवार्य केलेली परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. ती उत्तीर्ण न झाल्यास सर्व रक्कम वसूलपात्र असेल, असे **हमीपत्र** विद्यार्थ्यांकडून घेण्यात यावे.

५. परदेशातील पद्व्युत्तर अभ्यासक्रम त्यासाठी असलेल्या विहित कालावधीतच पूर्ण होणे आवश्यक आहे. विद्यार्थ्याने परस्पर विद्यापीठ अथवा अभ्यासक्रम अथवा दोन्हीही बदलल्यास शिष्यवृत्तीची रक्कम संपूर्णत: वसूल करण्यात येईल.

६. (अ) ज्या विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती मंजूर करण्यात आली आहे, त्यांच्या अभ्यासक्रमाच्या एकूण खर्चाच्या रकमेपैकी **प्रथम वर्षाचे** शुल्क, निर्वाह भत्ता व इतर अनुषंगिक खर्च यांची रक्कम संबंधित विद्यापीठाकडून प्रमाणित माहिती प्राप्त करुन घेऊन संचालक, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी थेट विद्यापीठास अदा करावी.

(ब) त्यानंतरच्या वर्षाचे शुल्क, निर्वाह भत्ता व इतर अनुषंगिक खर्च याबाबत विद्यापीठाकडून प्रमाणित माहिती आणि विद्यार्थ्याच्या प्रगती व उपस्थितीबाबतचे प्रमाणपत्र प्राप्त करुन घ्यावी. त्यानुसार संचालक, समाजकल्याण, पुणे यांनी शासन निर्णयाप्रमाणे संबंधीत वर्षाची अनुज्ञेय शिष्यवृत्ती रक्कम संबंधीत विद्यापीठास अदा करावी.

७. याबाबत होणारा खर्च हा "मागणी क्रमांक एन-३, २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग यांचे कल्याण, ०१ - अनुसूचित जातीचे कल्याण, २७७, शिक्षण, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना (वि.घ.यो.), (०४) (२३), विदेशात विशेष अध्ययन करण्यासाठी अनुसूचित जातीच्या विद्यार्थ्यांना राजर्षि शाहू महाराज शिष्यवृत्ती, (२२२५ ३८३ २), ३४ शिष्यवृत्त्या / विद्यावेतन" या लेखाशिर्षाखाली खर्ची घालून त्याखाली केलेल्या सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षात मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा. त्याकरीता संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

८. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेब साईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक क्रमांक २०१०१०२७२००१०६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( सतीश म. गवई )**
**प्रधान सचिव,महाराष्ट्र शासन**

प्रत,

मा.मुख्यमंत्री यांचे सचिव
मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
मा.मंत्री, सामाजिक न्याय यांचे स्वीय सहाय्यक
मा.राज्यमंत्री, सामाजिक न्याय यांचे स्वीय सहाय्यक
प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
महालेखापाल, महाराष्ट्र - १/२, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
निवड नस्ती, मावक-२

शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,मंत्रालय विस्तार भवन, मुंबई क्रमांक : इबीसी २०१०/प्र.क्र.१९४/मावक-२, दिनांक : २७ ऑक्टोबर,२०१० चे सहपत्र

## परिशिष्ट "अ"

| अ क्र | शाखा / अभ्यासक्रम | विद्यार्थ्याचे नाव | प्रवेश घेतलेल्या विदयापीठाचे नाव | अभ्यासक्रमाचे नाव | पदव्युत्तर परीक्षेतील गुणांची टक्केवारी | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | पीएच. डी. कला | यशपाल अशोकराव जोगदंड | University of St. Andrews, Scotland, U K | Ph. D. Psychology | ७७% | |
| २ | पीएच. डी. विज्ञान | आशिष गौतम तेलगोटे | नमूद नाही | Material Science Ph.D. | ७४% | ऑफर लेटर अद्याप मिळालेले नाही. ते दिनांक ३१ जानेवारी २०११ पर्यंत सादर करण्याच्या अटीस अधीन राहून |
| ३ | पीएच. डी. विज्ञान | तरुणकुमार हेमराज मदने | South West Thames Institute for RENA UK | Ph.D. Life Science | ६९% | |
| ४ | विधी एल एल बी | सुरज मिलिंद एंगडे | Birmingham University UK | LLM Inter national Human Rights | ५७.४४% | |
| ५ | व्यवस्थापन | राहूल नारायण इंगोले | Anglia Ruskin University UK | MBA | ७४.५०% | |
| ६ | व्यवस्थापन | श्रीकांत काशिराम आठवले | University of Wales UK | MBA | ६७.५९% | |
| ७ | व्यवस्थापन | गणेश पीतांबर कोळवाण | Sullivan University U.S.A. | MBA | ६४.६६% | |
| ८ | हॉटल ॲड मिनेस्ट्रेशन | प्रज्ञा रामू जाधव | University of Wales, Institute of Cardif, U. K. | M B A | ६३.६७% | |

| अ क्र | शाखा / अभ्यासक्रम | विद्यार्थ्याचे नाव | प्रवेश घेतलेल्या विदयापीठाचे नाव | अभ्यासक्रमाचे नाव | पदव्युत्तर परीक्षेतील गुणांची टक्केवारी | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|---|
| ९ | हॉटेल मॅनेजमेंट अँड टुरिझम मॅनेजमेंट | संघर्ष प्रेम उके | E Thames Graduate School UK | MBA including Professional Advance Diploma in Management Studies | ६३.५७% | संबंधित संस्था मान्यता प्राप्त आहे याची खात्री करण्याच्या अटीच्या अधीन राहून |
| १० | बी कॉम | कृतिका अनिल काळे | Lancaster University UK | M. Sc. Inter national Business Management | ६०.८३% | |
| ११ | बी एस्सी | हरिदास नवनाथ साठे | James Cook University Australia | M I I / MBA | ६०.१६% | संबंधित संस्था मान्यता प्राप्त आहे याची खात्री करण्याच्या अटीच्या अधीन राहून |
| १२ | हॉटेल मॅनेजमेंट | सुशांत अरुण कांबळे | Ealling Hammersmith & West London College UK | Post Graduate Diploma in Patisserie Confectionery | ५७.००% | संबंधित संस्था मान्यता प्राप्त आहे याची खात्री करण्याच्या अटीच्या अधीन राहून |
| १३ | हॉटेल मॅनेजमेंट | राकेश शांताराम मोरे | The Professional Bar & Restaurant School New Zealand | PBRS Diploma in Hospitality Management | ५५.००% | संबंधित संस्था मान्यता प्राप्त आहे याची खात्री करण्याच्या अटीच्या अधीन राहून |
| १४ | बी ई - मेकॅनिकल | भुषण पुरषोत्तम विरुळकर | Loughborough Unviersity Graduate School U.k | M. Sc. Engineering Design | ७४.७८% | |
| १५ | बी. ई. मेकॅनिकल | शुभंकर बाळकृष्ण हंकारे | University of Sheffield UK | M. Sc. Aerostructure and Aerodynamic | ६८.२०% | |
| १६ | बी ई प्रॉडक्शन | अतुल भरत वाघमारे | University of Surrey UK | M. Sc. Setallite Communication Engg. | ६७.८४% | |
| १७ | बी ई मेकॅनिकल | कौस्तुभ हिरालाल सोनावले | University of California | Master of Science | ६६.२८% | |

| अ क्र | शाखा / अभ्यासक्रम | विद्यार्थ्यांचे नाव | प्रवेश घेतलेल्या विदयापीठाचे नाव | अभ्यासक्रमाचे नाव | पदव्युत्तर परीक्षेतील गुणांची टक्केवारी | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|---|
| १८ | बी टेक | प्रवीणकुमार गंगाधरराव कंधारे | Texax A & M University U. S. | M. S. Computer Science | ६५.००% | |
| १९ | बी ई-मेकॅनिकल | किरण बाळकृष्ण गायकवाड | College for Creative Studies Detroit | Master of Fine Arts | ६५.००% | |
| २० | बी टेक प्रॉडक्शन | शिलरात अशोकराव कोल्हे | Middlesex University London UK | M. Sc. Engineering Project Management | ६३.८०% | |
| २१ | बी ई | कु. नेहा सचिन जाधव | Loughborough University Graduate School Uk | M Sc Construction Project Management | ६२.९७% | |
| २२ | बी ई | राहूल राजेंद्र कदम | Bournemouth University UK | M Sc Engineering Project Management | ६२.२५% | |
| २३ | बी ई | संतोष बाळासाहेब पोवार | Bournemouth University UK | M. Sc Engineering Project Management | ५९.००% | |
| २४ | बी एस्सी मेडीकल बायो टेक्नॉलॉजी | प्रसाद सपंतराव सवारकर | University College London | M Sc Nano Technology & Regenerati ve Medicine | ७२.००% | |
| २५ | बॅचलर ऑफ ऑक्यु पेशनल थेरपी | कु. ललिता लक्ष्मण शिंदे | The University of Northhampton U K | M. Sc. Advance Occupational Therapy | ६०.२०% | |

**** O ****